शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना / शिकाऊ उमेदवारी योजना व एस.सी.व्ही.टी. अंतर्गत व्यवसाय अभ्यासक्रम इ. परीक्षाकरिता परीक्षा शुल्कात सुधारणा करणे/मानधनात सुधारणा करणे व परीक्षा शुल्काची रक्कम स्वीय प्रपंची लेखा (PLA) मध्ये जमा करुन परीक्षेच्या अनुषंगाने होणारा खर्च त्यामधून भागविण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांकः आयटीआय-२०१०/५९/प्र.क्र. ३२/व्यशि-३

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २५ मे, २०१५

वाचा :

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. TSA/४९७३/२५०३१-IX, दि.२ ऑगस्ट १९७५

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. TSA/५७८६/७४९८७/ सीआर-११८९ / ताशि-४, दि. २३ जानेवारी, १९९०

३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र. आयटीआय-१००२-४२०- व्यशि-२, दि.१० जून,२००३

४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.१७/ सीटीएसपरीक्षा/२०१५/२४ दि.७/१/२०१५

प्रस्तावना :

कारखान्यांना विविध कामासाठी लागणा-या कुशल मनुष्य बळाचा पुरवठा करणे , युवकांना कौशल्ययुक्त प्रशिक्षण देवून उत्पादन व इतर सेवा क्षेत्रामध्ये स्वयंरोजगार करण्यासाठी सक्षम बनविणे या उद्देशाने केंद्र शासनाकडून शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना,शिकाऊ उमेदवारी योजना व सेंटर ऑफ एक्सलन्स योजना इ. योजना राबविण्यात येत असून सदर योजनांची अंमलबजावणी सर्व राज्यांमध्ये करण्यात येते.

सध्या महाराष्ट्र राज्यामध्ये ४१७ शासकीय व ४५४ अशासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था कार्यरत आहेत. त्या पैकी शासकीय संस्थांची प्रवेश क्षमता १,००,००० व अशासकीय संस्थांची प्रवेश क्षमता ५०,००० इतकी असून दरवर्षी एकूण १,५०,००० एवढे प्रशिक्षणार्थी प्रशिक्षण घेत आहेत. त्या

संस्थामध्ये विविध योजनांमध्ये विहीत कालावधीसाठी प्रवेश दिले जातात व त्यांचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर महाराष्ट्र व केंद्रशासन स्तरावर विविध परीक्षा घेतल्या जातात.

वरील संदर्भीय शासन निर्णय क्र. ३ नुसार शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना व शिकाऊ उमेदवारी योजनांतर्गत घेण्यात येत असलेल्या परीक्षांकरिता परीक्षा शुल्क आकारण्यात येते. त्याचप्रमाणे वरील संदर्भीय शासन निर्णय क्र. १ नुसार विविध योजनांतर्गत परीक्षेच्या कामाकरिता मानधनाचे दर निश्चित करण्यात आलेले आहेत व संदर्भ क्र. २ नुसार जॉब तपासणी व उत्तरपत्रिका तपासणीचे दर निश्चित करण्यात आलेले आहेत. सदरचे दर हे अनुक्रमे १२, ४० व २५ वर्षापूर्वीचे असून त्या दरात सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना / शिकाऊ उमेदवारी योजना व एस.सी.व्ही.टी. अंतर्गत व्यवसाय अभ्यासक्रम व इतर अनुषंगिक योजनांतर्गत अभ्यासक्रम इ. अभ्यासक्रमाच्या परीक्षा शुल्कामध्ये खालीलप्रमाणे सुधारीत दरास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**सुधारीत परीक्षा शुल्क**

| अ.क्र. | योजना | तपशील | सुधारीत परीक्षा शुल्क |
|---|---|---|---|
| १ | शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना/एससीव्हीटी अंतर्गत व इतर अनुषंगिक योजनांतर्गत संचालनालयाचे स्तरावरुन घेण्यात येणा-या इतर परीक्षा. | नियमित प्रशिक्षणार्थी | रु.५५०/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति सत्र व जुन्या पॅटर्न करिता रु.५५०/- प्रति परीक्षा |
| | | माजी प्रशिक्षणार्थी | रु.६५०/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति सत्र व जुन्या पॅटर्न करिता रु.६५०/- प्रति परीक्षा |
| | | खाजगी उमेदवार | रु.७००/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति सत्र व जुन्या पॅटर्न करिता रु.७००/- प्रति परीक्षा |
| | | **विलंब शुल्क** | मुदत संपल्यानंतर पहीले १० दिवस प्रति दिन रु.२०/- प्रमाणे विलंब शुल्क त्यानंतर परीक्षा सुरु होण्याच्या ३ दिवस अगोदर पर्यंत प्रति दिन रु.५०/- अतिविलंब शुल्क आकारण्यात यावे. |
| २ | शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण योजना | नियमित प्रशिक्षणार्थी | रु.५५०/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति परीक्षा. |
| | | माजी प्रशिक्षणार्थी | रु.६५०/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति परीक्षा |
| | | खाजगी उमेदवार | रु.७००/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति परीक्षा |

| अ.क्र. | योजना | तपशील | सुधारीत परीक्षा शुल्क |
|---|---|---|---|
| | | **विलंब शुल्क** | मुदत संपल्यानंतर पहीले १० दिवस प्रति दिन रु.२०/- प्रमाणे विलंब शुल्क त्यानंतर परीक्षा सुरु होण्याच्या ३ दिवस अगोदर पर्यंत प्रति दिन रु.५०/- अतिविलंब शुल्क आकारण्यात यावे. |

शिल्प कारागीर प्रशिक्षण योजना/ शिकाऊ उमेदवारी योजना/एससीव्हीटी /एमएसईबी व इतर तत्सम योजनांच्या परीक्षांकरिता काम करणा-या अधिकारी/कर्मचा-यांना खालीलप्रमाणे मानधनाचेदर मंजूर करण्यात येत आहेत.

**सुधारीत मानधनाचे दर**

| अ.क्र. | संचालनालय ते परीक्षा केंद्र अंतर्गत परीक्षेचे काम करणा-या अधिकारी/कर्मचा-यांचा तपशील | मानधनाचे सुधारीत दर रु. |
|---|---|---|
| १ | **संचालनालय स्तर** | |
| | नियंत्रण अधिकारी | ५००/- प्रति दिन |
| | पर्यवेक्षकीय अधिकारी | ४००/- प्रति दिन |
| | परीक्षा नियंत्रक | ३००/- प्रति दिन |
| | लेखाधिकारी/अधीक्षक/ कॉम्प्युटर प्रोग्रामर | २००/- प्रति दिन |
| | रोखपाल/लिपिक/ संगणकीय कर्मचारी | १००/- प्रति दिन |
| | चतुर्थ श्रेणी कर्मचारी | ५०/- प्रति दिन |
| २ | **प्रादेशिक कार्यालय स्तर** | |
| | नियंत्रण अधिकारी | ४००/- प्रति दिन |
| | परीक्षा नियंत्रक / भरारी पथकातील अधिकारी | २००/- प्रति दिन |
| | लेखाधिकारी /अधीक्षक/ कॉम्प्युटर प्रोग्रामर | १५०/- प्रति दिन |
| | रोखपाल/ लिपिक/ संगणकीय कर्मचारी | ७५/- प्रति दिन |
| | चतुर्थ श्रेणी कर्मचारी | ५०/- प्रति दिन |
| ३ | **संस्थास्तर (परीक्षा केंद्र स्तर/ तपासणी केंद्र स्तर)** | |

| अ.क्र. | संचालनालय ते परीक्षा केंद्र अंतर्गत परीक्षेचे काम करणा-या अधिकारी/कर्मचा-यांचा तपशील | मानधनाचे सुधारीत दर रु. |
|---|---|---|
| | परीक्षा केंद्राध्यक्ष (परीक्षा प्रमुख)/तपासणी केंद्र प्रमुख | १५०/- प्रति दिन |
| | परीक्षा केंद्र अधीक्षक (Supdtt)/तपासणी केंद्र अधीक्षक | १२०/- प्रति दिन |
| | पर्यवेक्षक व नियंत्रण कक्षातील पर्यवेक्षकीय कर्मचारी / तपासणी केंद्रातील पर्यवेक्षकीय अधिकारी/कर्मचारी | ५०/- प्रति सत्र |
| | रोखपाल/लिपिक/ संगणकीय कर्मचारी /भांडारपाल | ७५/- प्रति दिन |
| | चतुर्थ श्रेणी कर्मचारी | ५०/- प्रति दिन |
| | उत्तरपत्रिका तपासणे | १०/- प्रति उत्तरपत्रिका |
| | प्रात्याक्षिक जॉब तपासणे (बाहय व स्थानिक तपासनीकासाठी समप्रमाणात) | २५/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति परीक्षक |
| ४ | प्रश्नपत्रिका तयार करणे (नमुना उत्तरपत्रिकेसह) | रु.२५०/- प्रति प्रश्नपत्रिका |
| ५ | प्रश्नपत्रिकेचे मराठी भाषंतर (नमुना उत्तरपत्रिकेसह) | रु.५०/- प्रति प्रश्नपत्रिका |

या व्यतिरीक्त परीक्षेच्या अनुषंगाने इतर कामासाठी कराव्या लागणा-या बाबीकरिता खालीलप्रमाणे शुल्क आकारण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | दुय्यम गुणपत्रिका/ दुय्यम तात्पुरते प्रमाणपत्र | रु.१००/- प्रति नग ५ वर्षापर्यंत<br>रु.१५०/- प्रति नग ५ ते १० वर्षापर्यंत<br>रु.२००/- प्रति नग १० वर्षापेक्षा जास्त कालावधीच्या गुणत्रिका/प्रमाणपत्रांसाठी |
| २) | दुय्यम अंतिम प्रमाणपत्र | रु २००/- प्रति नग ५ वर्षापर्यंत<br>रु.३००/- प्रति नग ५ ते १० वर्षापर्यंत<br>रु.४००/- प्रति नग १० वर्षापेक्षा जास्त कालावधीच्या अंतिम प्रमाणपत्रासांठी |
| ३) | प्रमाणपत्र पडताळणी | रु.२००/- प्रति प्रमाणपत्र |
| ४) | उत्तरपत्रिका झेरॉक्स प्रत | रु.२००/- प्रति उत्तरपत्रिका |
| ५) | OMR Sheet/Answer key झेरॉक्स प्रत | रु.१००/- प्रति नग |
| ६) | उत्तरपत्रिका फेरतपासणी | रु.१००/- प्रति उत्तरपत्रिका |

सेंटर ऑफ एक्सलन्स व आर्टीझन टू टेक्नोक्रॅट या परीक्षेचे परीक्षा शुल्क अद्यावत असल्या कारणाने सदर परीक्षांचे परीक्षा शुल्क पुर्वीप्रमाणेच त्या त्या योजनेच्या शासन निर्णयानुसार आकारण्यात येईल.

परीक्षा शुल्काची रक्कम व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या स्वीय प्रपंची लेख्यात (P.L.A.) जमा करुन वरीलप्रमाणे मंजूर केलेल्या सुधारीत दरानुसार मानधनावरील खर्च भागविणे, डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांना परीक्षा शुल्कापोटी करावयाची प्रतिपूर्ती व परीक्षा अनुषंगिक इतर सर्व बाबीवरील खर्च भागविण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांना सत्र परीक्षा जानेवारी-२०१५ करीता परीक्षा शुल्कापोटी करावयाच्या प्रतिपूर्तीची थकबाकीची रक्कम जुलै-२०१५ मध्ये जमा होणा-या परीक्षा शुल्काच्या रकमेतून भागविण्यात यावी.

सदर परीक्षा शुल्काची जमा रक्कम व त्या अनुषंगाने होणा-या खर्चावर संचालक (प्रशिक्षण) यांचे नियंत्रण राहील व या करिता सदर जमा व खर्चाबाबतची कार्यप्रणाली संचालक (प्रशिक्षण ) यांनी तयार करून त्यानुसार अंमलबजावणी करावी.

वरील प्रमाणे सुधारीत परीक्षा शुल्क/मानधन/इतर बाबीवरील दर हे जुलै-२०१५ च्या परीक्षेपासून लागू करण्यात येतील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११९/कोषा-५, दि. ३०.०४.२०१५ तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. २४२/१५/व्यय-५, दि. २२.०५.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२५१५२४४५७९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2015.06.15 13:03:55 +05'30'

**( विवेक मा. पाटील )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव

२) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव

३) मा.प्रधान सचिव उच्च व तंत्र शिक्षण मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,

४) सह सचिव (व्यशि) उच्च व तंत्र शिक्षण मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

५) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई

६) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई

७) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनालयामार्फत)

८) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)

१२) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (संचालनालयामार्फत)

१३) संबंधित प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)

१४) वित्त विभाग (व्यय-५/कोषा-५), मंत्रालय, मुंबई

१५) निवड नस्ती (व्यशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मुंबई.